**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या. याचे लेखे नोंदवही लिहीणे व अद्ययावत स्थितीची तपासणी करणे याबाबत समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो-२०१३/प्र.क्र.३००/रोस्वरो-१**

२रा मजला,मंत्रालय, मादाम कामा मार्ग

हुतात्मा चौक, मुंबई ४०० ०३२

तारीख: २७ ऑगस्ट, २०१५

वाचा -

१) शासन पत्र क्रमांकः वित्त, विभाग क्र. शासाउ-१०.१५/प्र.क्र.३८/सा.उ.दि.११.०८.२०१५

प्रस्तावना -

वित्त विभागाने त्यांच्या उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्या. चे लेखे नोंदवही ( Book of Accounts) लिहिणे व अद्ययावत स्थितीची तपासणी करणे याकरिता एक समिती गठीत करण्याबाबत कौशल्य विकास व उद्योजकता विभागास कळविले होते. त्यानुषंगाने अशी समिती गठीत करण्याचे विभागाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-**

कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादितचे सन २००८-०९ पर्यन्तचे वार्षिक अहवाल विधानमंडळाच्या पटलावर सादर करण्यात आलेले आहे. तद्नंतरचे अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादितचे वार्षिक अहवाल विधानमंडळास सादर करण्यात आलेले नाहीत. तरी, सदर महामंडळाचे लेखे नोंदवही (Book of Accounts) लिहीणे व अद्ययावत स्थितीची तपासणी करणे याकरीता वित्त विभागाच्या दि.११.०८.२०१५ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनेनुसार खालील दोन सदस्यांची एक समिती स्थापन करण्यात येत आहे.

**१) उप सचिव (रोस्वरो-१), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग - सदस्य**

**२) संचालक ( स्थानिक निधी लेखापरीक्षण), वित्त विभाग - सदस्य**

२. उपरोक्त समितीने अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादितचे सन २००९-२०१० पासून आजपर्यन्त लेखे नोंदवही (Book of Accounts ) अद्ययावत आहेत किंवा कसे, याची

तपासणी करावी. तसेच सदर लेखे लिहीण्याच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करावी व सदर लेख्याच्या अद्ययावत स्थितीची तपासणी करावी व त्याबाबतचा अहवाल प्रधान सचिव , कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांना सादर करावा.

३. याअनुषंगाने व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ,मर्यादित,मुंबई यांना असे कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त समितीस अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाचे सर्व संबंधित अभिलेख/कागदपत्र उपलब्ध करुन दयावेत व प्रकरणी आवश्यक ते सर्व सहकार्य करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२९१५३५१२५३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2015.08.29 15:38:18 +05'30'

**( सं.छ.तडवी )**

अवर सचिव

**प्रत,**

१. उप सचिव (रोस्वरो-१), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
२. संचालक, (स्थानिक निधी लेखापरीक्षण), वित्त विभाग, कोकण भवन, सहावा मजला, नवी मुंबई-४०० ०६१४
३. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित, मुंबई-४०० ००१
४. कक्ष अधिकारी,(सा.उ.), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. निवड नस्ती (रोस्वरो-१)